श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती या तीर्थक्षेत्रांच्या विकास आराखड्यास प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: तिर्थवि-२०२४/प्र.क्र.२४ (भाग-२)/यो-११
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०७ मार्च, २०२५

वाचा:-

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/१४४४,दि.४ जून २०१५.
२) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१६/प्र.क्र.४५/योजना-६, दि. ३१ जुलै, २०१७.
३) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१९/प्र.क्र.१६९/योजना-६, दि. २९ ऑगस्ट, २०१९.
४) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१५७(भाग-१)/योजना-६, दि. ०१ डिसेंबर, २०२२
५) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०२१/प्र.क्र.१५७(भाग-१)/योजना-६, दि. २३ मार्च, २०२३
६) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्रमांक:जा.क्र. जिनिस/अम/तिक्षेवि/२०२४-२५/१३४१, दि.११.१०.२०२४.
७) मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीचे दि.३० जानेवारी, २०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
८) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखालील शिखर समितीचे दि.०५ सप्टेबर, २०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना :-

श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती या तीर्थक्षेत्राच्या रु.२२३२.०० लक्ष इतक्या रकमेच्या विकास आराखडयास संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देऊन प्रथम टप्पात रु.४००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला होता. संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये दुसऱ्या टप्प्यात रु. ६००.०० लक्ष इतका निधी, संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये तिसऱ्या टप्प्यात रु. ६१६.०० लक्ष इतका निधी व संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये उर्वरित रु. ६१६.०० लक्ष असा एकूण रु. २२३२.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, अमरावती यांना वितरीत करण्यात आला होता.

शिखर समितीच्या निर्देशाप्रमाणे संदर्भ क्र.६ च्या पत्रान्वये श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती या तिर्थक्षेत्राच्या कामांसाठी प्रशासकीय मान्यतेचा रु. ३.९७ कोटीचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यास प्रशासकीय मान्यता देण्याची व निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"जिल्हाधिकारी, अमरावती यांनी सादर केलेल्या श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती या तीर्थक्षेत्राच्या आराखड्यातील कामे पूर्ण करण्यासाठी एकूण **रू. ३,९७,६७,६२६/- (रू.तीन कोटी सत्त्याण्णव लक्ष सदुसष्ट हजार सहाशे सव्वीस फक्त)** इतक्या रकमेच्या खालील विकास कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे." तपशीलवार विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे:-

| अ क्र | तीर्थक्षेत्राचे नाव | कामाचे नाव | प्र.मा.रक्कम रु. |
|---|---|---|---|
| १ | **श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती** | १. इमारत (तळमजला) (Including Plinth Protection) | २,७०,२७,८८०/- |
| | | २.रेन/रुफ वॉटर हार्वेस्टिंग | २,००,०००/- |
| | | ३.रॅम्प फॉर हॅन्डिकॅफ्स | १,००,०००/- |
| | | ४.विद्युतीकरण (अंतर्गत व बाह्य) | २९,७३,०६७/- |
| | | ५. डेव्हलपमेंट ऑफ ग्राउंड | १,००,०००/- |
| | | ६. पार्किंग व्यवस्था | १,००,०००/- |
| | | ७. मृदा तपासणी व जमीन सर्वेक्षण | १,००,०००/- |
| | | ८. रेन वॉटर हार्वेस्टिंग करिता अंडरग्राउंड वॉटर टँक | २,००,०००/- |
| | | ९. वॉटर मेन स्टोरेज, पंप हाऊस, बोअरवेल | २,००,०००/- |
| | | १०.इतर Centage Charges ४% ,ग्रीन बिल्डींग ५%,GST १८% | ८०,६६,६७९/- |
| **एकूण रक्कम** | | | **३,९७,६७,६२६/-** |

०२. ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत राज्यातील ग्रामीण तीर्थक्षेत्राना निधी वितरीत करण्यासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात एकूण रु.१००००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर तरतुदीतून उपलब्ध निधीच्या मर्यादेत श्री क्षेत्र रिद्धपूर ता.मोर्शी, जि. अमरावती या तीर्थक्षेत्रातील विकास कामांसाठी प्रशासकीय मान्यतेच्या प्रथम टप्यात १०% म्हणजे रु.३९.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी, अमरावती यांना वितरीत करण्यात येत आहे.

०३. जिल्हाधिकारी, अमरावती यांनी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामावरच सदर निधी खर्च करावा. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यतेमधील मंजूर कामे पूर्ण करण्याकरिता शासन उक्त निधी वितरीत करीत आहे. सबब, सदर निधी संबधित कार्यान्वयिन यंत्रणेला वितरीत करताना व प्रत्यक्ष खर्च करताना तसेच सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयात नमूद अटी-शर्ती व त्यामध्ये दिलेले संबंधित निर्देश व प्रचलित नियम लागू राहतील.

०४. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी असल्याची व बांधकामासाठी आवश्यक जागा ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद मालकीची आहे, याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

०५. मंजूर निधीचा योग्य विनियोग होण्यासाठी व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही या दृष्टीने जिल्हाधिकारी, अमरावती यांनी दक्षता घ्यावी. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिती विहित मुदतीत सादर करावी. तसेच, जिल्हाधिकारी, अमरावती यांनी या योजनेकरिता झालेल्या/ होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाचा ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी व सदर निधी आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व कार्यालयास सादर करावे.

०६. राज्य शासनामार्फत वेळावेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले आदेश/ नियम/ शासननिर्णय/ वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०७. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/ १४४४, दिनांक ०४ जून, २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल

०८. निधीकरिता जिल्हा नियोजन अधिकारी/सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, अमरावती यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून धोषित करण्यात येत असून जिल्हाधिकारी, अमरावती यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०९. या विभागाच्या शासन निर्णय दि.१६/११/२०१२ नुसार पशूहत्त्या व अंधश्रद्धा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार नाही, अशी स्पष्ट तरतूद आहे. त्यामुळे या तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार होणार नाही याची दक्षता संबंधितांनी घ्यावी व असे प्रकार झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल

१०. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात

११. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००)(०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता रु.२.०० ते २५.०० कोटीपर्यत अनुदान (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रः अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/ अर्थ-३ दि.१ एप्रिल, २०२४ व शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ मधील अटी व शर्तींची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र.३८१/२०२४/व्यय-१५ दि.३०/०५/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202503071603453520 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.03.07 17:21:18 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर,
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंबई,
११. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
१२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, अमरावती,
१६. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती,
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती,
१८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , अमरावती,
१९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती,
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,

२१.नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
२२.वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२,
२३.कक्ष अधिकारी, का. क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग,
२४.निवड नस्ती (का.यो-११). ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.